राष्ट्रीय कृषी विकास योजनेतंर्गत सन २०११-१२ या वर्षात ० ते १०० हेक्टर सिंचन क्षमतेच्या प्रगतीपथावरील लघुपाटबंधारे योजना पूर्ण करण्यासाठी निधी वितरीत करणे बाबत.

महाराष्ट्र शासन
क्रमांक-लपायो-२०११/प्र. क्र.२५८/जल-४
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०७ डिसेंबर, २०११.

वाचा :

१. राज्य प्रकल्प मंजुरी समितीची (SLSC)दि. १६/८/२०११ रोजीचे बैठक इतिवृत्त
२. शासन निर्णय क्रमांक, कृषि विभाग, क्र. राकृवि-२०११/प्र.क्र. ६६/राकृवियो कक्ष, दिनांक ६/९/२०११
३. कृषि विभागाचे क्र. राकृवि-२०११/प्र.क्र.६६/राकृवियोकक्ष दि. ६/९/२०११ चे पत्र
४. ग्राम विकास व जलसंधारण विभाग यांचे पत्र क्रमांक असक-२०११/प्र.क्र. १७/जल-११, दिनांक २६ सप्टेंबर, २०११ चे पत्र.
५. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.लपायो-२०११/प्र.क्र. २५८/जल-४, दिनांक ०३ नोव्हेंबर, २०११.
६. शुध्दीपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.लपायो-२०११/प्र.क्र. २५८/जल-४, दिनांक १७ नोव्हेंबर, २०११.

**प्रस्तावना :**

संदर्भ क्रमांक ५ येथील दिनांक ०३ नोव्हेंबर, २०११ च्या शासन निर्णयान्वये व संदर्भ क्रमांक ६ येथील शुध्दीपत्रक दिनांक १७ नोव्हेंबर, २०११ अन्वये रु. १६९८.५४ लक्ष इतका निधी ० ते १०० हेक्टर सिंचन क्षमतेच्या प्रगतीपथावरील लघुपाटबंधारे योजना पूर्ण करण्यासाठी वितरीत करण्यात आला होता. उर्वरित निधी वितरीत करण्याची बाबत शासनाच्या विचाराधीन होती. या संदर्भात शासन खालील प्रमाणे निर्णय देत आहे.

## शासन निर्णय :-

० ते १०० हेक्टर सिंचन क्षमतेच्या प्रगतीपथावरील लघुपाटबंधारे योजना पूर्ण करण्यासाठी रु. १०१.४६ लक्ष इतका निधी या शासन निर्णयासोबत जोडलेल्या सहपत्रात नमूद केलेल्या योजनांसाठी रकाना क्र.०९ नुसार वितरीत करण्यास मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे. :-

१. लघुपाटबंधारे योजनांवरील यापूर्वी झालेला खर्च प्रमाणित करावा तसेच राष्ट्रीय कृषी विकास योजनमधून करावा लागणारा खर्चाची विशेषत्वाने वेगळी नोंद मोजमाप पुस्तकात (MB) घेण्यात यावी. प्रगतीपथावरील योजनांचे सद्यस्थितीतील छायाचित्र काढण्यात यावे व योजना पूर्ण झाल्यांनतरचे छायाचित्र घेण्यात यावे व सदर छायाचित्र देयकासोबत नस्तीत ठेवावेत.

२. पूर्ण झालेल्या व प्रगतीपथावरील योजनांची कामे गुणवत्तापूर्वक झाल्याचे सक्षम अधिकाऱ्याने तपासून प्रमाणित करणे बंधनकारक असेल.तसेच पूर्ण झालेल्या लघुपाटबंधारे योजनांच्या हस्तांतरणाची कार्यवाही तात्काळ करावी

३. सोबत जोडलेल्या सहपत्रात रकाना क्र. ९ मध्ये नमुद केल्यानुसार निधी धनादेशाव्दारे संबंधित कार्यकारी अभियंता, लघुपाटबंधारे (स्थानिक स्तर) विभाग, जालना व औरंगाबाद यांना सुपूर्द करण्यात यावा.

४. संबंधित कार्यकारी अभियंता, लघुपाटबंधारे (स्थानिक स्तर) विभाग, जालना व औरंगाबाद यांनी प्राप्त होणारा निधी या योजनेसाठी उघडलेल्या राष्ट्रीय बँकेत स्वतंत्र खात्यात जमा करावा, तसेच याबाबीचे स्वतंत्र लेखे ठेवण्यात यावेत.

५. प्रस्तुत निधी संबंधित कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर) विभाग जालना व औरंगाबाद यांना खर्च करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

६. सोबत जोडलेल्या सहपत्रात नमुद योजनांचा समावेश सर्वंकष जिल्हा कृषि आराखडयामध्ये ( CDAP) मध्ये करुन त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

७. वितरित करण्यात आलेला निधी त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात येत आहे, याची खातरजमा करण्याची जबाबदारी संबंधित अधिक्षक अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर) मंडळ, औरंगाबाद यांची राहील.

८. प्राप्त झालेला निधी हा सन २०११-१२ या वित्तीय वर्षात खर्च करावयाचा असून सदर खर्च राज्यस्तरीय प्रकल्प मान्यता समिती तसेच राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या मागदर्शक तत्वानुसार करण्यात यावा.

९. सदर प्रकल्पांची अंमलबजावणी करतांना आयुक्त, कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे, राज्य छोटया शेतकऱ्यांचा व्यापार संघ, पुणे, मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर) महाराष्ट्र राज्य, पुणे व अधिक्षक अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर) मंडळ, यांचेशी सनियंत्रण व मूल्यमापन करणेबाबत आवश्यक तो समन्वय साधण्याची जबाबदारी संबंधित कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर) विभाग व कार्यकारी अभियंता, लघुसिंचन विभाग, जिल्हापरिषद यांची राहिल.

१०.सदर प्रकल्पाचा मासिक आढावा घेण्याचा व त्याबाबतचा नैमित्तिक अहवाल शासनास सादर करण्याची जबाबदारी संबंधित कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे

(स्थानिक स्तर) विभाग व कार्यकारी अभियंता, लघुसिंचन विभाग, जिल्हापरिषद यांची राहील.

११. सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर) महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या स्वाक्षरीने सादर करण्यात यावे.

प्रस्तूत प्रकरणी प्राप्त होणारा निधी खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा :-

मागणी क्रमांक -डी- ३
२४०१ - पीक संवर्धन
(००) (८००) इतर खर्च
(००) (०९) राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत अर्थसहाय्य
(२४०१८२३५) योजनातंर्गत / दत्तमत्त
पंचवार्षिक योजनातंर्गत योजना
(१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना) ३३ अर्थ सहाय्य

सदर शासन निर्णय मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या दिनांक १६ ऑगस्ट, २०११ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार तसेच कृषी विभागाने संदर्भ क्रमांक ३ अन्वये निर्गमित केलेल्या शासन निर्णयाच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईट वर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१११२०७१०४६०३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावने.

(सुनील चव्हाण)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
मा. राज्यपाल यांचे सचिव
मा. मुख्यमंत्री यांचे सह सचिव
मा. उपमुख्यमंत्री यांचे उप सचिव
मा. मंत्री ( जलसंधारण ) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री ( जलसंधारण ) यांचे खाजगी सचिव
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
मा. प्रधान सचिव (कृषी विभाग) मंत्रालय, मुंबई
मा. प्रधान सचिव (वित्त विभाग) मंत्रालय, मुंबई
मा. प्रधान सचिव (नियोजन विभाग) मंत्रालय, मुंबई

मा. प्रधान सचिव (जलसंपदा विभाग) मंत्रालय, मुंबई
मा. प्रधान सचिव ( जलसंधारण ) यांचे स्वीय सहाय्यक
उप सचिव, (राकृवियो कक्ष), कृषी विभाग, मंत्रालय, मुंबई
उप सचिव ( जलसंधारण ) मंत्रालय, मुंबई ३२
मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर ) महाराष्ट्र राज्य, पुणे
अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर ) मंडळ, औरंगाबाद
कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर ) विभाग, जालना व औरंगाबाद
महालेखाकार, ( लेखा परिक्षा ) मुंबई / नागपूर
महालेखाकार, ( लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई / नागपूर,
निवड नस्ती जल-४

**राष्ट्रीय कृषी विकास योजना सन २०११-१२ अंतर्गत ० ते १०० हेक्टर सिचन क्षमतेच्या प्रगतीपथावरील लघुपाटबंधारे योजना पूर्ण करण्यासाठी निधी वितरण शासन निर्णय क्र लपायो २०११ /प्र क्र २५८/जल ४ दिनांक ०७ डिसेंबर, २०११ चे सहपत्र**

| अ.क्र. | योजनेचे नांव | जिल्हा | तालुका | सिंचन क्षमता हेक्टर | मंजूर किं मत रू. लक्ष | वितरीत निधी (रू. लक्ष) | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | भूसंपादन | कामे | एकुण |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १ | नंदापूर पात १० | जालना | जालना | २७ | २६.३२ | ०.०० | २३.६३ | २३.६३ |
| २ | बेलखेडा गात क्र. २ | परभणी | जिंतूर | ३५ | १५.५२ | ०.०० | १३.५२ | १३.५२ |
| ३ | किवळ गात क्र. २ | परभणी | जिंतूर | ३८ | १५.९० | ०.०० | १३.९० | १३.९० |
| | **एकूण जालना स्थानिक स्तर विभाग** | ३ | | १०० | ५७.७४ | ० | ५१.०५ | ५१.०५ |
| १ | साताळा गात २ | औरंगाबाद | औरंगाबाद | ११ | १२.५० | ०.०० | १२.५० | १२.५० |
| २ | कोणेवाडी गात ५ | औरंगाबाद | औरंगाबाद | १३ | १२.५६ | ०.०० | १२.४० | १२.४० |
| ३ | बोरवाडी तांडा गात २ | औरंगाबाद | औरंगाबाद | १० | ११.०१ | ०.०० | ११.०१ | ११.०१ |
| ४ | हातमाळी गात क्र. ३ | औरंगाबाद | औरंगाबाद | १२ | १६.८० | ०.०० | १४.५० | १४.५० |
| | **एकूण औरंगाबाद स्थानिक स्तर विभाग** | ४ | | ४६ | ५२.८७ | ० | ५०.४१ | ५०.४१ |
| | **एकूण** | ७ | ० | १४६ | ११०.६१ | ० | १०१.५ | १०१.४६ |

सूची : पात- पाझर तलाव, कोपब- कोल्हापूर पद्धतीचे बंधारे, गात- गाव तलाव, जबां- जलबांध, सिंबं- सिमेंट बंधारे



(स्वाक्षरी) चव्हाण